**अंगणवाडी केंद्रातील बालकांची आधारकार्ड नोंदणीकरिता मुख्यसेविका / पर्यवेक्षिका यांना "नोंदणी अधिकारी" म्हणून घोषित करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एबावि-२०१५/प्र.क्र.१४ (भाग-१)/का.०६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २१ नोव्हेंबर, २०१६

वाचा :- आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांचे पत्र क्र. ३७४९, दिनांक २४/१०/२०१६

**प्रस्तावना :-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजना ही केंद्र पुरस्कृत योजना राज्यामध्ये ग्रामीण, आदिवासी आणि नागरी भागांमध्ये अंगणवाडी केंद्रामार्फत राबविण्यात येते. केंद्र शासनाच्या सुचनांनुसार सर्व राज्यांना अंगणवाडी केंद्राचे क्षेत्रातील ० ते ६ वयोगटातील बालके, गरोदर महिला व स्तनदा माता तसेच अंगणवाडी सेविका / मदतनीस / मिनी अंगणवाडी सेविका यांची आधारकार्ड नोंदणी करणे अनिवार्य केलेले आहे. तसेच महिला व बाल विकास विभागास नोंदणी विभाग म्हणून घोषित केलेले आहे. त्यानुसार केंद्र शासनाने माहे डिसेंबर, २०१६ पर्यंत बाल आधारकार्ड नोंदणी करणेबाबतच्या सूचना दिलेल्या आहेत. तसेच आधारकार्ड नोंदणी झालेल्या बालकांनुसार केंद्र शासनामार्फत पोषण आहाराचा निधी उपलब्ध होणार आहे. त्यामुळे ज्या बालकांची आधारकार्ड नोंदणी होणार नाही, त्या बालकांसाठी केंद्र शासनाकडून मिळणारा पोषण आहारावरील निधी उपलब्ध होणार नाही. त्यामुळे सदर बालके आहारापासून वंचित राहतील. मा.सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार प्रत्येक बालकास ३०० दिवस आहार देणे बंधनकारक केले आहे. अन्यथा मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशाची अवहेलना होण्याची शक्यता नाकारता येत नाही.

एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत राज्यातील एकुण ५५३ प्रकल्पातील कार्यरत ९७४७५ अंगणवाडी केंद्रातील ० ते ६ वर्षे वयोगटातील एकुण ७९८६९३३ इतक्या बालकांचे बाल आधारकार्ड काढण्याकरिता अंगणवाडयांमध्ये मोहिम राबविण्यात येत आहे. परंतु आधारकार्ड काढण्याकरिता आवश्यक मशिन तसेच पुरेसे कर्मचारी संबधित विभागाकडे उपलब्ध नसल्यामुळे बाल आधारकार्ड काढण्याचे काम अतिशय धिम्यागतीने होत आहे. संपुर्ण आधारकार्ड नोंदणी होत नसल्यामुळे Line Listing चे काम पुर्ण होत नाही. त्यामुळे सर्व अंगणवाडयातील लाभार्थ्यांची नोंदणी होण्यास अडचणी निर्माण झालेल्या आहेत. Line Listing संबधी शासनाच्यावतीने मा. उच्च न्यायालयात माहे डिसेंबर, २०१६ अखेरपर्यत Line Listing चे काम पुर्ण होईल असे शपथपत्र सादर करण्यात आलेले आहे.

वरील सर्व बाबी विचारात घेऊन बाल आधारकार्डची नोंदणी जलद गतीने व्हावी यासाठी एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत कार्यरत मुख्यसेविका / पर्यवेक्षिका यांना आधारकार्ड नोंदणी करणेसाठी माहिती तंत्रज्ञान

(IT) या विभागाकडून प्रशिक्षित करुन त्यांना नोंदणी अधिकारी म्हणून घोषित करणेबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजना ही केंद्र पुरस्कृत योजना आहे. त्यामुळे केंद्र शासनाने दिलेल्या सुचनांचे तंतोतत पालन करणे अभिप्रेत आहे. यास्तव बाल आधारकार्ड नोंदणी करणेसाठी राज्यातील ग्रामीण / आदिवासी व नागरी विभागातील सर्व मुख्यसेविका / पर्यवेक्षिका यांना माहिती तंत्रज्ञान (IT) या विभागाकडून प्रशिक्षण घेणे तसेच सदर विभागाकडून घेण्यात येणारी ऑन लाईन परिक्षा देणे बंधनकारक करण्यात येत असून सदर प्रशिक्षित मुख्यसेविका / पर्यवेक्षिका यांना बाल आधारकार्ड नोंदणी करणेसाठी **“नोंदणी अधिकारी”** म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सद्यस्थितीत आधारकार्ड नोंदणी करिता केंद्र शासनाकडून प्रत्येक कार्ड नोंदणीमागे रु.२७/- इतके मानधन नोंदणी अधिकाऱ्यास दिले जाते. तेवढेच मानधन संबधित बाल आधारकार्ड नोंदणी अधिकारी म्हणून घोषित केलेल्या मुख्यसेविका / पर्यवेक्षिका यांना देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांनी मुख्यसेविका / पर्यवेक्षिका यांच्याकडून त्यांच्या कार्यक्षेत्रातील सर्व बालकांची आधारकार्ड नोंदणी करुन घ्यावी. सदर कामाचा जिल्हानिहाय मासिक अहवाल अपर मुख्य सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सादर करावा.

केंद्र शासनाकडून आधारकार्ड नोंदणीसाठी देण्यात येणारे रु.२७/- प्रती आधारकार्ड नोंदणी याप्रमाणे निधीची मागणी केंद्र शासनाकडे वेळीच आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांनी करावी. सदर निधी केंद्र शासनाकडून प्राप्त झाल्यानंतर त्याचे मुख्यसेविका / पर्यवेक्षिका यांना कशाप्रकारे वाटप करण्यात येणार आहे त्याची कार्यपध्दती विहित करुन त्यास शासनाची मान्यता घ्यावी. आधारकार्ड नोंदणीचे काम माहे डिसेंबर, २०१६ अखेरपर्यंत पुर्ण करुन घेण्याची जबाबदारी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांच्यावर सोपविण्यात येत आहे. सदर आदेशाची तात्काळ अंमलबजावणी करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११८१२०११३८०३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind P Shenoy

Digitally signed by Milind P Shenoy
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Womens And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5a1cf9161e18ca8fa3b7a2263c18944e06f156ba19752cad5615c266d0b4ffb8, cn=Milind P Shenoy
Date: 2016.11.23 11:58:58 +05'30'

**(मि.प. शेणॉय)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई

२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई
४) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
५) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई
६) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
७) सर्व मंत्रालयीन विभाग
८) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर
९) महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, नवी मुंबई
१०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
११) सर्व विभागीय आयुक्त
१२) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, विधानभवन, मुंबई
१३) सर्व जिल्हाधिकारी
१४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१५) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास विभाग
१६) सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी
१७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१८) वित्त विभाग/व्यय-६, मंत्रालय, मुंबई
१९) नियोजन विभाग/का.१४७२, मंत्रालय, मुंबई
२०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२१) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
२२) सहायक संचालक (वित्त व लेखा), एबाविसेयो, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
२३) सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी, (बाल कल्याण), जिल्हा परिषद
२४) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण / आदिवासी / नागरी)
२५) महिला व बाल विकास विभागातील सर्व कार्यासने
२६) निवड नस्ती (कार्यासन ६)